**राज्यातील सर्व महानगरपालिकांनी दि.०१.०३.२०१७ ते दि.३१.०३.२०१७ पर्यंत मालमत्ता कर व पाणीपट्टी कर यांची १००% वसुली करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०१७/प्र.क्र.५६/नवि-२०**
हुतात्मा राजगूरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०१ मार्च, २०१७.

<u>वाचा</u>:- शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र. एमसीओ-२०१७/प्र.क्र.१६/नवि-१४, दिनांक ०१.०२.२०१७

<u>प्रस्तावना :-</u>

राज्यातील नागरीकरणाचा वेग वाढता असून, सध्या राज्यातील सुमारे ५० टक्के क्षेत्राचे नागरीकरण झाले आहे. वाढऱ्या नागरीकरणामुळे येणाऱ्या जबाबदाऱ्या व कर्तव्य स्वत:च्या आर्थिक क्षमतेवर महानगरपालिकांनी पार पाडणे अपेक्षित आहे. नागरी भागाच्या सुनियोजित व सपंन्न विकासासाठी लोकाभिमूख नागरी प्रशासनाकडून महत्वाची भूमिका बजावली जाते. राज्यातील नागरी स्थानिक संस्था आर्थिक दृष्ट्या स्वयंपूर्ण असाव्यात व स्वत:च्या आर्थिक क्षमतेवर त्यांनी नागरीकांना मुलभूत सेवा पुरवाव्यात ही रास्त अपेक्षा आहे. या अनुषंगाने, आर्थिक सक्षमता ही अत्यंत महत्वाची आहे.

२. मालमत्ता करापासून प्राप्त होणारे उत्पन्न हे नागरी स्थानिक संस्थाच्या महसूलाचा प्रमुख स्रोत आहे. मालमत्ता कराची प्रभावी वसुली झाल्यास, नागरी स्थानिक संस्थाची आर्थिक सक्षमता वाढण्यास निश्चित मदत होईल.

३. तथापि, सर्व साधारणपणे असे आढळून येते की, नागरी स्थानिक संस्थाची मालमत्ता कराची थकबाकी मोठ्या प्रमाणावर प्रलंबित असते. तसेच, प्रलंबित थकबाकीच्या वसुलीसाठी विशेष प्रयत्न केल्याचे आढळून येत नाही.

४. सर्व साधारणपणे नागरीकांकडून कराचा भरणा वेळेत केला जातो. तथापि, काही नागरीकांकडून मालमत्ता कराचा भरणा टाळले जाते. सर्व साधारणपणे सुमारे २० टक्के नागरीकांकडे थकबाकी पैकी सुमारे ८०टक्के रक्कम प्रलंबित असते. त्यामुळे, अशा थकबाकीदार नागरीकांकडून थकबाकीची रक्कम प्रभावीपणे वसुल करणे हे नागरी स्थानिक संस्थाच्या आर्थिक सक्षमतेच्या दृष्टीने आवश्यक आहे.

५. **सर्व महानगरपालिका आयुक्तांना सन २०१६-१७ मध्ये नेमून दिलेल्या KRA मध्ये महसुलवाढीसाठी केलेल विशेष प्रयत्न व आधीच्या वर्षाच्या तुलनेत महसूलात झालेली वाढ तसेच ९०% पेक्षा जास्त करवसूलीचे उद्दीष्ट देण्यात आले आहे. सदर उद्दीष्टाची पूर्तता करणे प्रत्येक महानगरपालिका आयुक्त यांच्यावर बंधनकारक आहे.**

६. नागरी स्थानिक संस्थाच्या मालमत्ता कराच्या रक्कमेची व थकबाकीची वसुली प्रभाविपणे झाल्यास त्यांच्यी आर्थिक सक्षमता वाढण्यास व पर्यायाने नागरीकांना मुलभूत सुविधा कार्यक्षमतेने उपलब्ध करुन देण्यास मदत होईल. त्यादृष्टीने राज्यातील सर्व महानगरपालिकांनी दि.३१.०३.२०१७ पर्यंत मालमत्ता कर व पाणीपट्टी यांची १००% वसुली करण्याबाबत विशेष मोहिम राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

<u>शासन निर्णय:-</u>

राज्यातील महानगरपालिका ह्या अर्थिक दृष्ट्या सक्षम करण्याच्या प्रयत्नांचा भाग म्हणून त्यांच्या क्षेत्रात दिनांक ०१.०३.२०१७ ते दिनांक ३१.०३.२०१७ या कालावधीत “विशेष वसुली मोहीम” राबविण्याच्या निर्णय शासनाने घेतला आहे.

२. सर्व महानगरपालिकांनी त्यांच्या कार्यक्षेत्रामध्ये दिनांक ३१.०३.२०१७ पर्यंत मालमत्ता कर व पाणीपट्टी यांच्या १००% वसुलीबाबत कसोशीने प्रयत्न करणे आवश्यक आहे. त्यादृष्टीने पुढीलप्रमाणे कालबध्द कार्यक्रम आखण्यात यावा :-

- दिनांक ०१.०३.२०१७ ते दिनांक १०.०३.२०१७ या कालावधीत सर्व थकबाकीदार नागरिकांना थकबाकीची रक्कम भरण्याबाबत स्मरण देण्यात यावे.
- थकबाकीदारांची यादी उतरत्या क्रमाने तयार करण्यात यावी. त्यापैकी, अधिकतम थकबाकी असलेल्या ३० टक्के थकबाकीदारांवर विशेष लक्ष पुरविण्यात यावे.
- दिनांक ११.०३.२०१७ ते दिनांक २०.०३.२०१७ या कालावधीत महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमामधील कलम १२८ व प्रकरण ८ कराधार नियमातील तरतूदीनुसार पुढील कार्यवाही करण्यात यावी.
- थकबाकीची रक्कम सक्तीच्या उपायोजनांसह वसुल करताना सुध्दा संबंधित मोठ्या ३० टक्के थकबाकीदारांकडून थकीत रक्कमेची प्राध्यान्याने वसुली करुन घेण्यात येईल अथवा वसुली न झाल्यास अशा मोठ्या ३० टक्के थकबाकीदारांच्या बाबतीत उक्त अधिनियमातील तरतुदीनुसार दंडनिय कार्यवाही प्राधान्याने करण्यात यावी.
- या शिवाय सर्व महानगरपालिका क्षेत्रातील शासकीय / निमशासकीय कार्यालयांकडे मोठ्या प्रमाणावर थकबाकीची रक्कम प्रलंबित असल्यास, अशा संबंधित कार्यालय प्रमुखांना सदर रक्कमेचा भरणा तत्काळ करण्याबाबत कळविण्यात यावे. तसेच, अशा थकबाकीदार शासकीय / निमशासकीय कार्यालयांची माहिती संबंधित जिल्हाधिकारी व आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांनाही कळविण्यात यावी. संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी थकबाकीदार शासकीय / निमशासकीय कार्यालयांना थकीत रक्कमेचा भरणा करुन घेण्याबाबत योग्य त्या सूचना द्याव्यात.

३. कर वसुलीची मोहीम प्रभावीपणे राबविण्याच्या दृष्टीने सर्व महानगरपालिकांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील मोठे थकबाकीदार निश्चित करण्यात यावे व त्यांची यादी तयार करुन त्यांच्यापासुन थकबाकी वसुलीची मोहिम सुरु करण्यात यावी. वर नमुद केल्याप्रमाणे कालबध्द कार्यक्रम आखून, पुरेशी व वाजवी संधी देवूनही जे थकबाकीदार रक्कम भरणार नाहीत त्यांच्या मालमत्तांच्याबाबतीत उक्त अधिनियमातील कलम १२८ अनुसार कार्यवाही करुन, वसुलीची प्रक्रिया दि. ३१.०३.२०१६ अखेर पुर्ण होईल याची सर्व महानगरपालिकांनी दक्षता घ्यावी.

४. वर नमुद केल्याप्रमाणे दि.०१.०३.२०१७ ते दि.३१.०३.२०१७ या कालावधीत सर्व महानगरपालिकांमध्ये कालबध्द कार्यक्रम आखून, “विशेष वसुली मोहीम” प्रभावीपणे राबविण्याची जबाबदारी संबंधित आयुक्तांची राहील. तसेच, आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांची या “विशेष वसुली मोहीमेचे संनियत्रंण करावे व वसुलीच्या वेळोवळी घेण्यात येणाऱ्या आढाव्यात ज्या महानगरपालिका ह्या प्रभावीपणे वसुली करु शकत नसल्याचे आढळून आल्यास संबंधित आयुक्त यांना त्याबाबत मार्गदर्शन करुन जास्तीत-जास्त वसुली कशाप्रकारे करता येईल याबाबत सूचना द्याव्यात.

५. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांनी “विशेष वसुली मोहीम” संपुष्टात आल्यावर संपूर्ण राज्याचा सर्व महानगरपालिका निहाय वसुलीचा एकत्रित अहवाल दि.२०.०४.२०१७ पर्यंत शासनास सादर करावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०११६२४३४५७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Jayasingrao N Patil
Date: 2017.03.01 16:26:08 +05'30'

**( ज.ना.पाटील )**
**शासनाचे सह सचिव**

**प्रति,**

१) मा.विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
२) सर्व सन्मानीय विधानसभा / विधानपरिषद व संसद सदस्य
३) मा.राज्यपाल महोदय यांचे सचिव
४) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
५) सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६) मा.राज्य निवडणूक आयोग यांचे कार्यालय
७) मा.मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक
८) मा.लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय
९) मुख्यमंत्री महोदय यांचे जनसंपर्क अधिकारी
१०) राज्यातील सर्व महानगरपालिकांचे आयुक्त
११) कक्ष अधिकारी (नवि-२९), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, सदरचा शासन निर्णय विभागाच्या नागरीकांची सनदवर प्रसिध्द करण्यात यावा.
१२) निवडनस्ती (नवि-२०)